**मागासवर्गीयांचा सरळसेवा भरती तसेच पदोन्नतीमधील अनुशेष भरुन काढण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
**शासन परिपत्रक क्रमांक : बीसीसी-२००२/१३०६/१६-ब,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,**
दिनांक : २ जानेवारी, २००३

**संदर्भ :** (१) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : बीसीसी-१०९५/ ९६६/प्र.क्र.५/९५/१६-ब, दिनांक २९ ऑगस्ट,१९९८, व ११ सप्टेंबर,१९९८.

(२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : बीसीसी-१०९५/९६६/प्र.क्र.५/९५/१६-ब, दि.१० मार्च, १९९९

(३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : बीसीसी-२००२/ १३०६/१६-ब, दिनांक ३१ ऑक्टोबर, २००२ व समक्रमांक शासन शुध्दीपत्रक दि.११/१२/२००२.

**शासन परिपत्रक**

उपरोक्त संदर्भ क्र. १ येथे नमूद केलेल्या दि.२९ ऑगस्ट, १९९८ व दि.११ सप्टेंबर, १९९८ च्या शासन परिपत्रकान्वये मागासवर्गीयांचा सरळसेवा व पदोन्नतीमधील अनुशेष भरुन काढण्याबाबत विशेष भरती मोहिम सुरु करण्याच्या सूचना निर्गमित केलेल्या आहेत. त्यास अनुसरुन शासकीय /निमशासकीय सेवा तसेच मंडळे,महामंडळे,महानगरपालिका, नगरपालिका, जिल्हापरिषदा, व शासकिय अनुदानप्राप्त संस्था, सहकारी संस्था, विद्यापिठे व शासकिय उपक्रम इत्यादींच्या आस्थापनेवरील सरळसेवा भरती व पदोन्नतीमधील मागासवर्गीयांचा अनुशेष दिनांक ३१ डिसेंबर,२००२ पर्यंत भरुन काढण्यासाठी राज्य शासनाने संदर्भ क्रमांक (३) येथे नमूद केलेल्या दि.३१ ऑक्टोबर, २००२ च्या शासन परिपत्रकान्वये सूचना निर्गमित केलेल्या आहेत. सदर सूचनांच्या अनुषंगाने वित्त विभागाच्या दि.१० सप्टेंबर, २००१ च्या शासन निर्णयान्वये आढावा घेणे आवश्यक आहे का ? अनुशेष म्हणजे काय तसेच सरळसेवा व पदोन्नतीसाठी निवडप्रक्रीया व निवडसूच्या करण्यासाठी लागणाऱ्या कालावधीमुळे मुदतवाढ मिळणार का इत्यादीबाबत विविध विभागांकडून व इतर कार्यालयांकडून मार्गदर्शन करण्याची विचारणा करण्यात येत होती. त्यास अनुसरुन खालीलप्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत :-

(अ) शासकीय /निमशासकीय सेवा तसेच मंडळे,महामंडळे,महानगरपालिका, नगरपालिका, जिल्हापरिषदा, शासकिय अनुदानप्राप्त संस्था, सहकारी संस्था, विद्यापिठे व शासकिय उपक्रम इत्यादी कार्यालयातील सर्व संवर्गाची पदनिर्मिती, पदभरती व पदांचे पुनरुज्जीवन याबाबतच्या निर्बंधासंदर्भात वित्त विभागाने दि.१० सप्टेंबर, २००१ च्या शासन निर्णयान्वये आदेश निर्गमित केलेले आहेत. त्यानुसार नियुक्ती प्राधिकाऱ्याने त्यांच्या आस्थापनेवरील पदांचा आढावा घेणे आवश्यक आहे.

(ब) शासकीय,निमशासकीय इत्यादी कार्यालयातील सरळसेवा भरती व पदोन्नतीमधील मागासवर्गीयांचा अनुशेष भरुन काढण्याबाबत यापूर्वीच वेळोवेळी आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत. तसेच सामान्य प्रशासन विभागाने दि.१० मार्च, १९९९ च्या शासन परिपत्रकात अनुशेषाची व्याख्या पुढीलप्रमाणे स्पष्ट केलेली आहे. " सरळसेवा भरती अथवा पदोन्नती यापैकी कोणत्याही मार्गाने पदे भरताना, बिंदू नामावलीनुसार आरक्षित पदावर त्या त्या गटाचा अर्हताप्राप्त उमेदवार उपलब्ध न झाल्यास असे आरक्षित बिंदु अनुशेष म्हणून पुढील भरती प्रक्रियेच्या वेळेत विचारात घेणेकरिता पुढे ओढण्यात यावेत. एका विशिष्ट भरती प्रक्रियेची सुरुवात करताना त्यापूर्वी शेवटच्या भरती प्रक्रियेनंतर अशा रितीने पुढे ओढण्यात आलेली आरक्षित रिक्त पदे (Carried forward Reserved Vacancies) म्हणजेच अनुशेष होय." सदरील अनुशेष सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१८/१०/१९९७ च्या शासन निर्णयानुसार त्या त्या संवर्गामध्ये मागासवर्गीयांच्या वेगवेगळया गटांसाठी आरक्षणाच्या विहित टक्केवारीच्या मर्यादेत विशेष भरती मोहिमेतंर्गत पूर्णपणे भरुन काढता येईल. चालू रिक्त पदे (Current Vacancies) नेहमीच्या पध्दतीनुसार बिंदूनामावलीनुसार भरण्यात यावीत असेही दि.१० मार्च, १९९९ च्या शासन परिपत्रकात स्पष्ट केलेले आहे.

(क) मागासवर्गीयांची पदे ही घटनेनुसार आरक्षित असल्यामुळे ही पदे व्यपगत होत नाहीत. ही पदे भरणे बंधनकारक आहे.

(ड) महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत भरण्यात येणाऱ्या गट-क च्या पदाबाबत प्रत्येक विभागाने पदांचा आढावा घेवून मागणीपत्र महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे पाठविण्यात यावे. तसेच राज्यस्तरीय संवर्गातील सर्व पदे विहित मार्गाने भरण्यात यावी.

२. **मागासवर्गीयांची सरळसेवा भरती/पदोन्नतीमधील अनुशेषाची पदे दिनांक ३१ मार्च, २००३ पर्यंत भरण्यास मुदतवाढ देण्यात येत आहे. सदरील पदे विहित मुदतीत भरण्यात आली नाहीत तर संबंधीत नियुक्ती प्राधिकाऱ्या विरुध्द शिस्तभंगाधी कार्यवाही मंत्रालयीन प्रशासकीय विभागाने करावी.**

३. दि.३१ मार्च, २००३ पर्यंत अनुशेषाअंतर्गत भरण्यात आलेल्या पदांचा एकत्रीत अनुपालन अहवाल मंत्रालयीन प्रशासकिय विभागाने या विभागाच्या दि.३१ ऑक्टोबर,२००२ च्या परिपत्रकासोबत जोडलेल्या विवरणपत्रात दि.३० एप्रिल, २००३ पर्यंत शासनास सादर करावा व त्याची एक प्रत संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र शासन, पुणे यांच्याकडे पाठविण्यात यावी.

४. मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या प्रशासकिय नियंत्रणाखालील सर्व शासकीय/निमशासकीय इत्यादी कार्यालयांना या परिपत्रकानुसार योग्य त्या सूचना विनाविलंब निर्गमित करण्यात याव्यात व त्याची एक प्रत या विभागाकडे पाठवावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(दे.त्र्यं.कुमावत)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव/अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय,अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकायुक्त आणि उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
संचालक, समाज कल्याण, पुणे,
संचालक, आदिवासी विकास, नाशिक,
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
संचालक, सेवायोजन, मुंबई,
सहायक आयुक्त (मागासवर्ग कक्ष), सर्व विभागीय आयुक्तांची कार्यालये,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती,

* पत्राने.

एच-992(ए)(6000-1-03)1अ.